महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील परिविक्षाधीन अधिका-यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करणे, तसेच त्यांना अनुज्ञेय असलेल्या वार्षिक वेतनवाढी मंजूर करणेबाबत.
राज्यसेवा मुख्य परीक्षा - २०१२

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मविसे-१०/प्र.क्र.८९/२०१६/आस्था-३अ,

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
दिनांक: २६ ऑगस्ट, २०२०

**संदर्भ :**

१) **शासन आदेश, ग्राम विकास विभाग, क्र. मविसे-१०/प्र.क्र.१७५/ २०१३/आस्था-३अ, दिनांक १५/०१/२०१४.**
२) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. हिंभाष-१००१/१२४५/प्र.क्र.८४/०२/२०-ब, दिनांक २२/१०/२००२.**
३) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही/प्र.क्र.५/९४/आठ, दिनांक ०३/०२/१९९४.**
४) **महाराष्ट्र लोकसेवा आयोग, अधिसूचना क्र. पी १ (२) (३९)/एक दिनांक ०५ जुलै, २०१८.**

**आदेश :**

संदर्भाधिन शासन आदेश क्र.१ अन्वये श्री. राहुल अशोक शेळके यांची महाराष्ट्र विकास सेवा गट-अ संवर्गात परिविक्षाधीन अधिकारी म्हणून नेमणूक करण्यात आली होती. तसेच संदर्भाधिन शासन निर्णय क्र. २ नुसार श्री. शेळके यांनी परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासाठी आवश्यक असणा-या बाबी (जसे कामकाज समाधानकारक असणे, मराठी व हिंदी भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे, वर्तणूक शोभनीय असणे तसेच परिविक्षाधीन काळात त्यांनी उपभोगलेल्या रजा विचारात घेणे) समाधानकारकरित्या पूर्ण केल्या आहेत.

२. तसेच संदर्भ क्र. ४ येथील अधिसूचनेनुसार श्री. शेळके हे दिनांक ०२ ते ०४ जानेवारी, २०१८ या कालावधीत घेण्यात आलेल्या जानेवारी, २०१४ च्या विभागीय परीक्षेत उत्तीर्ण झाले आहेत. त्यामुळे खालील तक्त्यातील रकाना क्र. (पाच) मध्ये नमूद केलेल्या दिनांकापासून त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यास शासन मंजूरी देत आहे. त्याप्रमाणे श्री. शेळके यांना अनुज्ञेय असलेल्या वार्षिक वेतनवाढी देवून त्यांची वेतननिश्चिती तात्काळ करण्यात यावी. तसेच श्री. शेळके हे मराठी भाषा (उच्चस्तर व निम्नस्तर) परीक्षा संदर्भातील “महाराष्ट्र शासकीय कर्मचारी (न्यायीक विभागातील कर्मचा-यांव्यतिरिक्त) मराठी भाषा नियम, १९८७” मधील तरतुदींची पूर्तता करतात. त्यामुळे त्यांना उक्त

नियमातील नियम ४(४) मधील तरतूदी अन्वये नियुक्ती प्राधिका-यांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार शासनाच्या एतदर्थ मंडळाच्या “मराठी भाषा”(उच्चस्तर व निम्नस्तर) परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्यात येत आहे. तसेच, श्री. शेळके हे हिंदी भाषा (उच्चस्तर व निम्नस्तर) परीक्षा संदर्भातील शासन निर्णय सा.प्र.वि. दिनांक ०१.१२.१९८४ मधील अटींचीही पूर्तता करतात. त्यामुळे शासन निर्णय सा.प्र.वि. दिनांक २२.१०.२००२ अन्वये नियुक्ती प्राधिका-यास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार श्री. शेळके यांना “हिंदी भाषा” परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्यात येत आहे.

| अ. क्र. | परि.अधिकाऱ्याचे नाव | रूजू झाल्याचा दिनांक | परिविक्षाधीन कालावधीत घेतलेल्या रजा | परिविक्षाधीन कालावधी समाप्त केल्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| १. | **श्री. राहुल अशोक शेळके** | **०५.०२.२०१४** | **१७ दिवस** | **२१.०२.२०१६** |

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८२६१२५००६५४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Ramesh Shinde

Digitally signed by Vivek Ramesh Shinde
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400001, st=Maharashtra,
2.5.4.20=98222e73b61528cee875e0cab75e0243 7703c365921479fb0198fcf43d79d224, serialNumber=3d2f2d59501068679dd214122d6 3cb4d2d18b76f5a89cae6eca0162ae6701444,
cn=Vivek Ramesh Shinde
Date: 2020.08.26 16:06:12 +05'30'

**(विवेक शिंदे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) विभागीय आयुक्त, अमरावती
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अकोला,
३) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुश्रेयता / लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर
४) संबंधीत अधिकारी द्वारा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अकोला.
५) कार्या, आस्था-२, कार्या आस्था-३, ग्राम विकास विभाग
६) निवड नस्ती (आस्था-३अ)